(1)

2011040821375500१

**केंद्र पुरस्कृत योजना.**
**राज्यातील अग्निशमन व आणिबाणी सेवांचे बळकटीकरण करणेबाबत.** (2)

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण १४०९/१११६/प्र.क्र.२३१/नवि-२०
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २०११.

वाचा:- १) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक ११-४/पीआर-ऐओ/एमएनए/लोन/२००९-२०१०/२९५०-५५, दिनांक १९.०१.२०१०.
२) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक- VI-१४०२८/१(१५)/२०१०-डीजीसीडी (एफ), दिनांक २२.०९.२०१०

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने देशातील सर्व राज्यांमध्ये अग्निशमन व आणीबाणी सेवांचे बळकटीकरण करण्याची योजना सुरु केली आहे. या योजनेमध्ये केंद्र शासनाचा ७५ % व राज्य शासनाचा २५% हिस्सा आहे. सदर योजनेअंतर्गत सन २००९-१०, २०१०-११ व २०११-१२ या तीन आर्थीक वर्षासाठी सर्व राज्यांकरिता रु. २००.०० कोटींची तरतूद केंद्र शासनाने केली आहे. त्या अंतर्गत महाराष्ट्र राज्याच्या अग्निशमन व आणिबाणी सेवांच्या बळकटीकरणासाठी रु. ८.३१२५ कोटीची तरतूद केली आहे. या तरतूदीपैकी रु. ६.६५ कोटी इतका हिस्सा केंद्र शासनाचा असून रु. १.६६२५ कोटी इतका राज्य शासनाचा आहे. या योजनेअंतर्गत केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक १ अन्वये सन २००९-१० या आर्थिक वर्षात रु. ३३ लक्ष व संदर्भ क्रमांक २ अन्वये सन २०१०-११ या आर्थिक वर्षात रु. १०७ लक्ष असा एकूण रु. १४० लक्ष इतका निधी वितरीत केला आहे. या योजनेअंतर्गत फक्त जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणी असलेल्या नगरपालिकांमध्ये कॉम्बी टूल्स, हायप्रेशर पंप व क्वीक रिस्पॉन्स व्हेईकल्स खरेदी करण्यासाठी केंद्र शासनाचा हिस्सा म्हणून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने सुरु केलेल्या राज्यांमध्ये अग्निशमन व आणीबाणी सेवांचे बळकटीकरण करण्याच्या योजनेअंतर्गत फक्त जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणी असलेल्या नगरपालिकांमध्ये कॉम्बी टूल्स, हायप्रेशर पंप व क्वीक रिस्पॉन्स व्हेईकल खरेदी करण्यासाठी सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षामध्ये रु. ७१,००,०००/- ( रुपये एकाहत्तर लक्ष फक्त ) इतकी रक्कम नगरपालिकांमध्ये कॉम्बी टूल्स, हायप्रेशर पंप व क्वीक रिस्पॉन्स व्हेईकल घेण्यासाठी खर्च करण्याच्या अटीच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

या खर्चाचे देयक काढण्यासाठी श्री. आ. रा. राजपूत, कक्ष अधिकारी, नवि-५, नगर विकास विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री. का. तु. सातकर, उप सचिव यांना नियंत्रण अधिकारी म्हणून

घोषित करण्यात येत असून सदर रकमेचा धनादेश संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई नावे काढावा व त्यांनी संबंधितांना सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे वाटप करावा.

यासबंधीचा खर्च " २२१७ नगर विकास - केंद्र पुरस्कृत योजना, १९२ महानगरपालिकांना सहाय्य, (००) (७६) अग्निशमन व आपत्कालिन सेवांच्या बळकटीकरण करण्यासाठी जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणी असलेल्या नगरपालिकांना सहाय्य, ( केंद्र हिस्सा ) (२२१७९३११ ) ३१ सहाय्यक अनुदाने." या लेखाशिर्षांतर्गत सन २०१०-११ या चालू वित्तीय वर्षाकरीता सोबतच्या **परिशिष्ट "अ "** मध्ये दर्शविलेल्या तरतूदीमधून खर्ची घालण्यांत यावा.

सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४०/१४४४, दिनांक - २५ मार्च, २०११ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११७/व्यय-३ व दिनांक ०१ मार्च, २०११, व अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३८९/अर्थ-१६, दिनांक ३१ मार्च, २०११ अंन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( डॉ. दिपक म्हैसेकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
मा. राज्यमंत्री (नगर विकास ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव -१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव -२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई/ महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई
संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, द्वारा, एम.आय.डी.सी. अंधेरी (प.) मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
मुख्याधिकारी, संबंधित नगरपालिका
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
श्री. का. तु. सातकर, उप सचिव तथा नियंत्रक अधिकारी (नवि-५) नगर विकास विभाग, मंत्रालय,
श्री. आ. रा. राजपुत, कक्ष अधिकारी, (नवि-५)/(नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी (व्यय-३)/ (अर्थसंकल्प-१६),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती, (नवि-२०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण १४०९/१९१६/प्र.क्र.२३१/नवि-२०
दिनांक :- ३१ मार्च, २०११ चे सहपत्र

**परिशिष्ट- "अ"**

( रुपये प्रत्यक्षात )

| अ.क्र. | नगरपालिकेचे नांव | जिल्हयाचे नांव | वितरीत करावयाची रक्कम **(केंद्र हिस्सा )** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | रायगड | रायगड | २००००० |
| २ | नंदुरबार | नंदुरबार | ११००००० |
| ३ | जालना | जालना | २००००० |
| ४ | परभणी | परभणी | २००००० |
| ५ | हिंगोली | हिंगोली | २००००० |
| ६ | वाशिम | वाशिम | ११००००० |
| ७ | बुलढाणा | बुलढाणा | ११००००० |
| ८ | यवतमाळ | यवतमाळ | २००००० |
| ९ | गोंदीया | गोंदीया | २००००० |
| १० | भंडारा | भंडारा | ११००००० |
| ११ | चंद्रपूर | चंद्रपूर | २००००० |
| १२ | गडचिरोली | गडचिरोली | २००००० |
| १३ | वर्धा | वर्धा | ११००००० |
| | | **एकूण** | **७१०००००** |